**संसर्गजन्य गर्भपात नियंत्रण राष्ट्रीय कार्यक्रम-**
**१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना सन २०११-१२**
**पासून राज्यात राबविण्यास प्रशासकीय मंजूरी**
**प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डीआयएस-२०११/प्र.क्र.२९८/पदुम-४,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १२ ऑक्टोबर, २०११**

**वाचा** १. केंद्र शासनाच्या पशुसंवर्धन विभागाचे पत्र क्र.५३-५१/२००९
एलडीटी/(एलएच)/व्हॉल-II, दि.२०.०४.२०११
२. पत्र क्र.५३-७२ (एमएचए) /२०१०-एलडीटी (एलएच), दि.२८.७.२०११.

**प्रस्तावनाः-**

संसर्गजन्य गर्भपात (ब्रुसेल्लोसिस) हा गायी, म्हशी, शेळ्या, मेंढ्या इत्यादी प्राण्यांमध्ये आढळणारा घातक आजार असून तो प्रजोत्पादनाशी निगडीत आर्थिकदृष्टया महत्वाचा आजार आहे. या आजारात ब्रुस्सेल्ला जिवाणूंच्या प्रादुर्भावामुळे गर्भावस्थेतील विविध कालावधीत गर्भपात घडून येतात व वंध्यत्व येते. हा रोग संसर्गजन्य असून मानवी आरोग्याच्या (Zoonotic Importance) दृष्टीने महत्वाचा आहे. भारतातील कृषिभूमीचे स्वरूप आणि जनावरे पाळण्याची पध्दत या रोगाचा मानवास प्रादुर्भाव होण्यास नेहमी हितावह ठरते. एखाद्या प्रक्षेत्रावर या रोगाची बाधा झाल्यास त्या प्रक्षेत्रावरील सर्व गाभण गाई-म्हशींमध्ये गर्भपात घडून येण्याची शक्यता नाकारता येत नाही. गाई-म्हशींमध्ये गर्भपात झाल्यामुळे त्यांचे पासून वेत न मिळाल्यामुळे शेतकरी / गोपालक / दुग्ध व्यवसायिकांचे मोठे आर्थिक नुकसान होते. या रोगाची गाय/ म्हशीस बाधा झाल्यानंतर अशी बाधित जनावरे आयुष्यभर या रोगाचा प्रसार करतात. या रोगावर उपाययोजना म्हणजे या रोगाचे रक्तजल सर्वेक्षण (Sero Surveillance) करणे व हा रोग प्रादुर्भाव होऊ नये म्हणून ज्या भागामध्ये संसर्गजन्य गर्भपात या रोगाचा जास्त प्रादुर्भाव दिसून येतो, अशा भागातील सर्व ६ ते ८ महिने वयोगटातील मादी वासरांना रोग प्रतिबंधक लसीकरण (Calf hood vaccination against Brucellosis) करणे आवश्यक ठरते. वासरांना एक वेळ संसर्गजन्य गर्भपात प्रतिबंधक लस टोचल्यानंतर अशा जनावरांना आयुष्यभर या रोगा विरूध्द प्रतिकार शक्ती प्राप्त होते. केंद्र शासनाच्या वाचा येथील दि.२०.०४.२०११ च्या पत्रान्वये ही योजना सन २०११-१२ पासून राबविण्यासाठी केंद्र शासनाने प्रशासकीय मंजूरी प्रदान केलेली आहे. तसेच वाचा येथील पत्र दि.२८.७.२०११ अन्वये सन २०११-१२ पासून केंद्र पुरस्कृत योजना-पशुंचे आरोग्य व रोग नियंत्रण (Livestock Health & Disease Control-LH & DC) या कार्यक्रमा अंतर्गत संसर्गजन्य गर्भपात नियंत्रण राष्ट्रीय कार्यक्रम (१०० टक्के केंद्र पुरस्कृत) ही योजना राज्यात राबविण्यासाठी पहिल्या टप्प्या अंतर्गत रू ६.१४७० कोटी एवढा निधी राज्यास वितरीत केलेला आहे.

सदर योजना सन २०११-१२ पासून राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय मंजूरी प्रदान करणे आवश्यक असल्याने खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णयः-**

केंद्र पुरस्कृत योजना-पशुंचे आरोग्य व रोग नियंत्रण (Livestock Health & Disease Control-LH & DC) या कार्यक्रमा अंतर्गत संसर्गजन्य गर्भपात नियंत्रण राष्ट्रीय कार्यक्रम (१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (National Control Programme on Brucellosis-NCPB) ही योजना सन २०११-१२ पासून राज्यात राबविण्यासाठी याद्वारे शासनाची प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

सदरची योजना केंद्र शासनाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सुचनांन्वये राबविण्यात यावी. केंद्र शासनाने वितरीत केलेल्या बाबनिहाय आर्थिक निकष व तरतूदीच्या अधिन राहून सदर योजनेवर खर्च करण्यात यावा.

या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. केंद्र शासनाकडून प्राप्त निधी खर्च झाल्यानंतर त्याबाबतचे विहित प्रपत्रातील उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर करण्यात यावे.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.४४४/१४३१, दि.१५.९.२०११ तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.४८४/२०११/व्यय-२, दि.३.१०.२०११ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१११०१२१०३७५५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नांवाने,**

**स्वाक्षरीत /-**
**(डॉ.संजय वि.डोईजोडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
६. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांचे मध्यवर्ती कार्यालये.
७. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
८. प्रधान महालखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
१२. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
१५. सर्व जिल्हाधिकारी.
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१८. सहआयुक्त पशुसंवर्धन, रोग अन्वेषण विभाग, औंध, पुणे
१९. सहआयुक्त पशुसंवर्धन, पशुजैव पदार्थ निर्मिती संस्था औंध, पुणे
२०. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.
२१. विधीमंडळ ग्रंथालय (१० प्रती)
२२. उपसंचालक, लेखा व कोषागार, कोकण विभाग, कोकण भवन, नवीन मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती.
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२४. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.
२५. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
२६. सहाय्यक आयुक्त, पशुसंवर्धन, विभागीय रोग अन्वेषण प्रयोगशाळा, पुणे, कोल्हापूर, चिपळूण, अकोला, औरंगाबाद, नाशिक व नागपूर
२७. अवर सचिव, पदुम-३/कक्ष अधिकारी पदुम-१/१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
28. निवड नस्ती.